वितरण आदेश क्र.१
सन २०१५-१६

यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे
**या संस्थेस सहाय्यक अनुदान २०१५-२०१६ ( योजनेतर)**
**एप्रिल व मे २०१५ ( पहिला हप्ता )**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः यशदा २०१५/प्र.क्र. ८३ /१५/१२ अ**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ४ जून, २०१५.

वाचा : १. सामान्य प्रशासन विभाग, शासन परिपत्रक क्र. - बीयुडी-२०१५/ प्र.क्र.७९ /२०१५/२५, दि.८ एप्रिल, २०१५
२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थसं २०१५/प्र.क्र.८५/अर्थ ३, दि.१७ एप्रिल, २०१५.

**शासन निर्णय :-**

यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे या संस्थेच्या २०१५-२०१६ या आर्थिक वर्षाच्या योजनेतर खर्चासाठी संदर्भाधीन क्र.१ च्या शासन परिपत्रकान्वये अर्थसंकल्पीय अंदाजामध्ये **रु.६००.०० लाख (रुपये सहाशे लाख फक्त)** इतकी तरतूद केली असून, त्यापैकी **रु. १००.०० लाख (रुपये शंभर लाख फक्त)** एवढे लेखा अनुदान **एप्रिल व मे, २०१५ या दोन महिन्यांचा खर्च भागविण्यासाठी** मंजूर झाले आहे. सदर योजनेतर सहाय्यक अनुदान नियंत्रक अधिकाऱ्यांच्या स्वाधीन करण्यात आले आहे.

२. यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे या संस्थेला वरील अनुदानातून **एप्रिल व मे, २०१५ या दोन महिन्यांकरिता योजनेतर खर्चासाठी (प्रशिक्षण शुल्क) अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेले एकूण रु.१००.०० लाख ( रुपये शंभर लाख फक्त )** इतके सहाय्यक अनुदान **( पहिला हप्ता )** मंजूर करण्यात येत आहे.

३. हा खर्च मागणी क्र .ए-४, मुख्य लेखाशिर्ष "२०७० - इतर प्रशासनिक सेवा - ००३ प्रशिक्षण (००)(०६) यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे यास सहाय्यक अनुदान (योजनेतर)(२०७००५३२) -३१ सहाय्यक अनुदाने (वेतनेतर)" याखाली सन २०१५-२०१६ या आर्थिक वर्षासाठीच्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

४. सदरहू मंजूर करण्यात आलेले अनुदान संबंधित कोषागारातून काढून घेतल्यानंतर ती काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शीर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र १५ दिवसांच्या आत शासनास सादर करावे.

५. संस्थेने आर्थिक वर्ष २०१५-२०१६ मधील मंजूर अनुदानाइतका खर्च सिमित ठेवावा.

६. संस्थेने आता वितरीत करण्यात येत असलेल्या अनुदानाचे तपशीलवार देयक व विनियोग प्रमाणपत्र (UTILIZATION CERTIFICATE) महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-१, मुंबई व शासनाला तातडीने सादर करावे.

७. यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे या संस्थेने उपरोक्त अनुदानामधुन केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई यांना राहतील व त्याकरिता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

८. यशदा, पुणे या संस्थेचे आहरण व संवितरण अधिकारी (कोड क्र.२२०१०००१२१) यांनी संस्थेस वितरीत करण्यात येत असलेल्या सहायक अनुदानाची रक्कम रु.१००.०० लाख ( अक्षरी रुपये शंभर लाख फक्त ) आहरित करावी.

९. सदर शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक क्र. अर्थसं २०१५/प्र.क्र.८५/अर्थ ३, दि.१७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारान्वये निर्गमित करण्यात येत आहे. सदर परिपत्रकाच्या परिशिष्टातील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची तसेच या परिपत्रकातील परिच्छेद ७ ते १८ मधील अटींची पूर्तता होत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०६०५१६०७२९०७०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ajit Sopanrao Deshmukh

Digitally signed by Ajit Sopanrao Deshmukh
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Ajit Sopanrao Deshmukh
Date: 2015.06.05 16:12:29 +05'30'

**( अजित सो. देशमुख )**
अवर सचिव , महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई,
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परीक्षा ), महाराष्ट्र-२, नागपूर,
३. मा. अ.मु.स. (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
४ महासंचालक, यशदा, पुणे.
५ लेखाधिकारी, यशदा, पुणे. (२ जादा प्रतींसह).
६. सह संचालक, लेखा व कोषागारे, (संगणक शाखा) , मुंबई-४०० ०३२
७.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे.
८.उप कोषागार कार्यालय, पुणे.
९. वित्त विभाग (व्यय-४ / अर्थसंकल्प १४), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
१०.नियोजन विभाग (कार्यासन १४४२), मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
११ अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन क्र.२५, मुंबई - ४०० ०३२.
१२.निवड नस्ती (सामान्य प्रशासन विभाग/कार्यासन १२-अ)